राज्यातील ग्रामीण रस्त्याच्या देखभालीसाठी रस्त्यांचे बांधकाम करणा-या कंत्राटदारावर देखभालीची जबाबदारी सोपविणे तसेच कामाची माहिती दर्शविणारे फलक कामाच्या ठिकाणी बसविणेबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय, क्रमांक -जिपर-२००९/प्र.क्र.१८०/पंरा-८,
दिनांक:- ३१ डिसेंबर,२००९.

**वाचा :-** १. शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक सिएटी-१०८७/प्र.क्र.९४/इमा-२, दिनांक १४.६.१९८९
२. शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग,क्रमांक-संकीर्ण-०५/०६/प्र.क्र.५३/इमा-२, दिनांक ८.९.२००६.
३. शासन परिपत्रक,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,क्रमांक-झेडपीए-२००६/प्र.क्र.३७६/वित्त-९, दिनांक २९.१.२००७
४. शासन पत्र, समक्रमांक दिनांक ४.७.२००९.
५. शासन पत्र, समक्रमांक दिनांक ३.८.२००९

**शासन निर्णय :-**

राज्यातील ग्रामीण भागातील रस्त्यांची गुणवत्ता योग्य दर्जाची ठेवण्याच्या दृष्टीने रस्त्यांची कामे पूर्ण झाल्यानंतर संबंधीत कंत्राटदाराने दोष निवारण कालावधीमध्ये रस्त्यांची देखभाल दुरुस्ती त्यांच्या खर्चाने करणे आवश्यक आहे. या संदर्भात शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक सिएटी-१०८७/प्र.क्र.९४/इमा.२, दिनांक १४.६.१९८९ अन्वये सविस्तर सुचना दिलेल्या आहेत. तथापि, दोष निवारण कालावधीमध्ये कंत्राटदाराकडून रस्त्याच्या खराब झालेल्या भागाची दुरुस्ती होत नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे.

२. या अनुषंगाने सर्व जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिका-यांना तसेच जिल्हा परिषदेअंतर्गत सर्व कार्यकारी अभियंता यांना खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

(१) राज्यातील ग्रामीण रस्त्यांच्या संदर्भात दोष निवारण कालावधी हा शासनाच्या वर उल्लेख केलेल्या दिनांक १४.६.१९८९ च्या निर्णयानुसार कामाच्या निविदेमध्ये तंतोतंत नमूद करण्यात यावा. ही जबाबदारी निविदा प्रपत्रे मंजूर करणा-या अधिका-याची राहील.

(२) दोष निवारण कालावधीमध्ये रस्त्याची देखभाल दुरुस्ती करण्याची जबाबदारी संबंधित कंत्राटदाराची राहील व ही जबाबदारी संबंधित कंत्राटदार काळजीपूर्वक पार पाडतो याचे सनियंत्रण जिल्हा परिषदेचे कार्यकारी अभियंता (बांधकाम) यांचेकडून

करण्यात येईल. तसेच दुरुस्तीचे काम केल्याबाबतचे अभिलेखही जिल्हापरिषदेचे कार्यकारी अभियंता (बांधकाम) यांचेकडून व्यवस्थित ठेवण्यात यावेत.

(३) प्रत्यक्ष कामांच्या जागी विहित प्रपत्रात कामाची माहिती दर्शविणारे फलक तातडीने बसविण्यात यावेत. या माहिती फलकामध्ये कंत्राटदाराचे नाव, कार्यारंभ आदेश, कामाचा खर्च,काम पूर्ण करावयाचा दिनांक, दोष निवारण कालावधी या सर्वांचा स्पष्ट उल्लेख असणे आवश्यक राहील.

(४) संबंधित कंत्राटदाराकडून निविदा करारातील अटी व शर्तीचे पालन न झाल्यास तसेच कामाचा गुणात्मक दर्जा राखला न गेल्यास अथवा दोष निवारण कालावधीमध्ये रस्त्याच्या देखभाल दुरुस्तीची जबाबदारी काळजीपूर्वक पार पाडण्यात आली नसल्यास संबंधीत कंत्राटदारावर शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक-संकीर्ण-०५/ ०६/प्र.क्र.५३/ इमा-२, दिनांक २८.९.००६ अन्वये कारवाई करण्यात यावी.

३. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी सदर विषय त्यांच्या मासिक बैठकीमध्ये समाविष्ट करावा व त्यांच्या अधिपत्याखालील संबंधित कार्यकारी अभियंता व इतर अधिका-यांकडून वरील सूचनांप्रमाणे कार्यवाही होईल याबाबत दक्षता घ्यावी. वरील सूचनांप्रमाणे कार्यवाही न करणा-या अधिकारी /कर्मचा-यांविरुध्द शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ मधील कलम १० खालील तरतूदीनुसार शिस्तभंगाची कारवाई करण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २००९१२३११३४४१९००१ आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,**

**( दि. ग. मोरे )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित:-**

१.सर्व विभागीय आयुक्त.
२.सचिव (रस्ते, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
३.सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
४.सर्व उप आयुक्त (विकास), विभागीय आयुक्त कार्यालय
५.सर्व जिल्हापरिषदांचे कार्यकारी अभियंता (बांधकाम)
६.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी.
७.कार्यासन क्रमांक वित्त-९, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
८.कार्यासन क्रमांक पंरा-८, निवड नस्ती, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.